नविन पर्यटन धोरणाचा मसुदा तयार करण्यासाठी नियुक्त केलेल्या सल्लागाराची फी अदा करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: टीडीएस २०१५/०२/प्र.क्र.९०(भाग-२)/ पर्यटन,**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक:- ६ ऑक्टोबर, २०१५.

संदर्भ :- शा.नि.क्र.टीडीएस २०१५/०२/प्र.क्र.९०(भाग-२)/पर्यटन, दि.१५/५/२०१५.

**शासन निर्णय :**

शा.नि.क्र.टीडीएस २०१५/०२/प्र.क्र.९०(भाग-२)/पर्यटन, दि.१५/५/२०१५ अन्वये शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, संचालक, माहिती व तंत्रज्ञान विभाग, शासन निर्यण क्र. GAD-मातंस ०८०/२०१४-०/० DIRECTORATE OF IT-DIT(MH) दि. ०१/०७/२०१४ अन्वये तयार करण्यात आलेल्या पॅनेलवरील के.पी.एम.जी. या सल्लागार कंपनीला नवीन पर्यटन धोरणाचा मसुदा तयार करण्यासाठी सल्लागार म्हणून दिनांक १/४/२०१५ ते दिनांक ३१/७/२०१५ या ४ महिन्याच्या कालावधीसाठी नियुक्त करण्यात आले आहे. तसेच सल्लागार फी म्हणून रु.२३,१९,९०० इतक्या खर्चास मान्यता देण्यात आली आहे.

२) के.पी.एम.जी. ॲडव्हायजरी सर्व्हिसेस प्रा.लि., मुंबई यांनी माहे, एप्रिल, मे व जून या तीन महिन्याची सल्लागार फी रु.१७,३९,९२५ इतक्या रकमेची मागणी केली आहे. पर्यटनस्थळाच्या ठिकाणी पायाभूत सुविधा पुरविण्यासाठी प्रादेशिक पर्यटन योजनेअंतर्गत सन २०१५-१६ मध्ये रु.१५७.५० कोटी इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. त्यापैकी ७०% रकम रु.११०.२५ कोटी माहे नोव्हेंबर,२०१५ अखेर वितरणास उपलब्ध आहे. सदर रु.११०.२५ कोटी तरतुदीतून रु.१७,३९,९२५/- इतकी रक्कम के.पी.एम.जी. ॲडव्हायजरी सर्विसेस प्रा. लि., मुंबई यांना उपलब्ध करुन देण्यास शासन मंजूरी देत आहे. तपशिल खालील प्रमाणे आहे.

| अ.क्र. | तपशिल | वितरीत करावयाची रक्कम |
|---|---|---|
| १ | व्यवस्थापक (रु.६८७५० ×३ महिने) | २,०६,२५० |
| २ | दोन वरीष्ठ सल्लागार (२ × रु.२,२०,००० ×३ महिने) | १३,२०,००० |
| | एकूण | १५,२६,२५० |
| ३ | सेवा कर १४% | २,१३,६७५ |
| | एकूण सर्व | १७,३९,९२५ |

३) प्रादेशिक पर्यटन योजनेअंतर्गत सन २०१५-१६ साठी रु.१५७.५० कोटी एवढी तरतूद करण्यात आली आहे. त्यापैकी रु.११०.२५ कोटी वितरणास उपलब्ध असलेल्या रकमेतून रु.१७,३९,९२५/-

(रुपये सतरा लाख एकोणचाळीस हजार नऊशे पंचवीस फक्त) इतकी रक्कम के.पी.एम.जी. ॲडव्हायजरी सर्विसेस प्रा.लि., मुंबई यांना या शासन निर्णयान्वये अदा करण्यास शासन खालील अटीच्या अधीन राहून मंजूरी देत आहे.

**अटी व शर्ती :-**

१) के.पी.एम.जी. ॲडवायजरी सर्व्हिसेस प्रा.लि., मुंबई या संस्थेस सल्लागार म्हणून नियुक्तीचा कालावधी ४ महिन्यांचा राहील.तथापि वर मंजूर केलेली रक्कम माहे, एप्रिल, मे व जून २०१५ या कालावधीची आहे.

२) ३ महिन्यांच्या कालावधीत वर नमूद केल्याप्रमाणे १,४७,३९,९२५/- इतकी रक्कम अदा करण्यात येत आहे.

३) ४ महिन्यांच्या कालावधीत मसुदा तयार न झाल्यास सल्लागाराने मसुदा तयार करण्यासाठी शासनाकडे मुदत वाढीसाठी किमान १५ दिवस अगोदर अर्ज दाखल करणे बंधनकारक राहिल.

४) मुदत वाढीबाबत शासन निर्णय घेईल परंतु, सल्लागार फीमध्ये वाढ करणार नाही.

५) सल्लागार संस्थेने सल्लागार म्हणून नियुक्ती स्विकारल्यापासून ४ महिन्यांचा कालावधी गणण्यात येईल.

६) सामान्य प्रशासन विभाग, संचालक, माहिती व तंत्रज्ञान विभाग, शासन निर्यण क्र. GAD-मातंस ०८०/२०१४-०/० DIRECTORATE OF IT-DIT(MH) दि. ०१/०७/२०१४ अन्वये नियुक्त केलेल्या संस्थेपैकी सदर संस्था असून सदर निर्णयातील अटी व शर्तीचे पालन करणे संस्थेवर बंधनकारक राहील.

७) निधीबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता शासनास सादर करण्यात यावे.

८) वर नमूद करण्यात आलेला खर्च हा सन २०१५-१६ या वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून मुख्यलेखाशीर्ष "मागणी **क्रमांक झेडडी-४, ३४५२-पर्यटन, पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१ पर्यटन केंद्रे (०२) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना, (०२) (१८) पर्यटन विकासासाठी विविध ठिकाणांसाठी मूलभूत सुविधांकरिता अनुदान (३४५२ १९५८) ३१ सहायक अनुदान (वेतनेत्तर)** या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१५-१६ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीत तरतुदीतून भागविण्यात यावा.

९) या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेली सहायक अनुदानाची रक्कम आहरीत करुन संबंधितांना वितरीत करण्याकरिता श्री. र.ल.लखोटे, कार्यासन अधिकारी, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून व श्री. ब.गु.सैदानवरु, उप सचिव पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले आहे. त्यांनी वरील निर्णयानुसार मंजूर करण्यात आलेल्या सहायक अनुदानाची रक्कम अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

येथून आहरीत करुन के.पी.एम.जी. ॲडवायजरी सर्व्हिसेस प्रा.लि., मुंबई यांना वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

१०) सदर निधी "कक्ष अधिकारी, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय,मुंबई" (Desk Officer, Tourism and Cultural Department, Mantralaya, MUMBAI) या नांवे E.C.S. द्वारे उपलब्ध करुन देण्यात यावा.

११) प्रमाणित करण्यात येते की, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थस २०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७/४/२०१५ मधील परिच्छेद ७ ते १८ मधील अट क्रमांक ७ — अ, ७-ब मूळ प्रस्तावास नियोजन व वित्त विभागाची मान्यता घेण्याची आवश्यकता नसून सन २०१५-१६ मध्ये अर्थसंकल्पीत तरतूद उपलब्ध आहे. अट क्र. ८ च्या अटी प्रमाणे वित्तीय अधिकारी नियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उप विभाग एक अ.क्र. २७ नियम क्र.१४९ नुसार प्रशासकीय विभागाला पुर्ण अधिकार आहेत. अट क्र.९ प्रमाणे उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त झाले आहे. तसेच अट क्र. १४ प्रमाणे बांधकामाचा प्रसतव नाही. तसेच परिशिष्ट मधील तपासणी सूचीतील अ.क्र. १,२ व ३ ची पूर्तता करण्यात आली आहे. अ.क्र.४ बाबत स्पष्ट करण्यात येते की, लेखापरीक्षक/ महालेखापाल यांचे कोणतेही गंभीर अक्षेप नाहीत. तसेच इतर अट क्र.५ ते ११ च्या प्रकरणी लागू होत नाहीत.

१२) हा शासन निर्णय वित्त विभाग शासन परिपत्रक अर्थस-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७/४/२०१५ तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग- पहिला, उप विभाग एक अ.क्र.२७ नियम क्र. १४९ प्रशाकीय विभागांना दिलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१३) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१५१००९१६१३१५९१२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ravindra
Laxmikant Lakhote

Digitally signed by Ravindra Laxmikant Lakhote
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=421202, st=Maharashtra, cn=Ravindra Laxmikant Lakhote
Date: 2015.10.09 16:15:35 +05'30'

( र.ल.लखोटे )
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
२) महालेखापाल, महाराष्ट्र - २, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
३) महालेखापाल (स्थानिक निकाय लेखापरीक्षा व लेखा), मुंबई.
४) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.

५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

७) नियोजन विभाग (कार्यासन-१४११/१४४४), मंत्रालय, मुंबई.

८) वित्त विभाग (का.व्यय-१४/अर्थोपाय) मंत्रालय, मुंबई.

९) अवर सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, (अर्थसंकल्प शाख), मंत्रालय, मुंबई.

१०) के.पी.एम.जी. ॲडवायजरी सर्व्हिसेस प्रा.लि., लोढा एक्सेलन्स, १ मजला , अपोलो मिल्स कंपाऊन्ड,एन.एम. जोशी मार्ग, महालक्ष्मी, मुंबई — ४०००११.

११) निवड नस्ती.

***